**विदेशी कलाकारांचा सहभाग असलेल्या कार्यक्रमांना ना-हरकत प्रमाणपत्र देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.- संकीर्ण-०८१८/प्र.क्र.-३००/विदेशी-१**
नविन प्रशासकीय इमारत,
९ वा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ३२.
दिनांक- १५ सप्टेंबर, २०१८.

**वाचा**- १) शासन परिपत्रक, गृह विभाग समक्रमांक दि. २३/८/२०१८.
२) शासन पत्र, गृह विभाग समक्रमांक दि. ५/९/२०१८.

**शासन परिपत्रक**

राज्यात आयोजित करण्यात येणाऱ्या कार्यक्रमांमध्ये विदेशी कलाकारांचा सहभाग असल्यास संबंधित आयोजक संस्थांना भारत सरकारच्या सुचनेनुसार ना-हरकत प्रमाणपत्र राज्य शासनाच्या गृह विभागामार्फत देण्यात येते. सदरहू आयोजक संस्था तसेच विदेशी नागरीक नोंदणी अधिकारी यांना संदर्भाधीन शासन परिपपत्रक तसेच शासन पत्रान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. ना-हरकत प्रमाणपत्र देण्याची कार्यपध्दती अधिक सोपी व सुटसुटीत करण्याच्या दृष्टीने खालील बाबी त्यात नव्याने समाविष्ट करण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक**

राज्यात आयोजित करण्यात येत असलेल्या विदेशी कलाकारांचा सहभाग असलेल्या कार्यक्रमांकरिता सर्व संबंधित आयोजक संस्थांनी कार्यक्रमाच्या किमान ८ कार्यालयीन दिवस अगोदर गृह विभागाच्या asoforeign1.efa-mh@gov.in या ई-मेलवर सर्व आवश्यक कागदपत्रे जोडून अर्ज सादर करावा. प्रस्तुत ई-मेलची प्रत संबंधित विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी कार्यालयाच्या या ई-मेलवर देखील पाठवावी. (मुंबई FRRO कार्यालयाचा ई-मेल frromum@nic.in अथवा fsc.mum-ivfrt@gov.in पुणे कार्यालयाचा ई-मेल pifrosb.pune@nic.in ) तसेच संपूर्ण प्रस्तावाची एक प्रत (हार्ड कॉपी) गृह विभागास सादर करावी.

२. गृह विभागाने संबंधित विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी यांच्याकडून कार्यक्रमातील विदेशी कलाकारांच्या सहभागाबाबत ई-मेलद्वारे अहवाल मागविल्यानंतर तीन कार्यालयीन दिवसात संबंधित विदेशी नागरिक नोंदणी कार्यालयाकडून अहवाल प्राप्त न झाल्यास त्या कार्यालयाची सहमती गृहित धरुन संबंधित आयोजक संस्थेस ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात येईल.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई तसेच पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांना राज्यातील कोणत्याही कार्यक्रमात विदेशी कलाकार सहभागी होणार असल्यास सदर कार्यक्रमास शासनाची मान्यता घ्यावी जेणेकरुन राज्यात एकही कार्यक्रम विनापरवाना पार पडणार नाही याकरिता वेगळ्याने सूचना द्याव्यात.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०९१९१२४१३६९१२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amar Chandrakant Zaware

Digitally signed by Amar Chandrakant Zaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d3427f3930c96a4cf61d24037072304e1a84a67a288fb5e841e95fc711f58a5e, cn=Amar Chandrakant Zaware
Date: 2018.09.19 12:46:38 +05'30'

**( अमर चं. झावरे )**

कक्ष अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, पुणे.
४) पोलीस अधीक्षक, पुणे.
५) सर्व आयोजक संस्था.
६) प्रादेशिक विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी, मुंबई.
७) सर्व विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
८) वरीष्ठ स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) वरीष्ठ स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव (अ.व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) वरीष्ठ स्वीय सहायक, प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (विदेशी-१ कार्यासन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.